महाराष्ट्र शासन

# विद्युत अभियांत्रिकी परिभाषा कोश

भाषा संचालनालय, महाराष्ट्र शासन

## भाषा सल्लागार मंडळ

**अध्यक्ष**

डॉ. वि. भि. कोलते

**सदस्य**

प्रा. गं. बा. सरदार
डॉ. ग. मो. पाटील
प्रा. भगवंत देशमुख
श्री. देवीसिंग व्यं. चौहान
श्री. त्रिं. गो. देशमुख
प्रा. अरविंद मंगरूळकर
श्री. पां. बा. साळुंखे
प्रा. कृ. श्री. अर्जुनवाडकर

**सदस्य–सचिव**

श्री. य. शं. कानिटकर, भाषा संचालक व
शासनाचे पदसिद्ध उपसचिव,
सामान्य प्रशासन विभाग

## विद्युत अभियांत्रिकी उपसमिती

**अध्यक्ष**

प्रा. म. गो. धडफळे, पुणे विद्यापीठ

**सदस्य**

प्रा. सि. द. पिंपरकर, तंत्र शिक्षण संचालनालय
प्रा. आ. रा. केळकर, नागपूर विद्यापीठ
प्रा. का. मं. कुलकर्णी, मुंबई विद्यापीठ
प्रा. म. ग. देशपांडे, मराठवाडा विद्यापीठ
श्री. भा. ल. देशपांडे, इमारती व दळणवळण विभाग
प्रा. ना. रा. फडणीस, शिवाजी विद्यापीठ
श्री. रा. कृ. गोखले, मराठी विज्ञान परिषद

**सदस्य–सचिव**

श्री. य. शं. कानिटकर, भाषा संचालक व
शासनाचे पदसिद्ध उपसचिव,
सामान्य प्रशासन विभाग

## प्रस्तावना

महाराष्ट्र राज्याच्या निर्मितीनंतर मराठी भाषेला राजभाषेचे स्थान मिळाले. साहजिकच महाराष्ट्रातील सर्व विद्यापीठांतील शिक्षणाचे माध्यम मराठी असावे हेही सर्वमान्य झाले. शिक्षणक्षेत्रातील माध्यमाचे हे परिवर्तन कार्यक्षमतेने घडवून आणण्यात मुख्यत्वेकरून दोन अडचणी होत्या.

पहिली अडचण म्हणजे शासकीय कामकाजासाठी व तांत्रिक विद्याशाखांसाठी आवश्यक असलेला पारिभाषिक शब्दसंग्रह हाताशी नव्हता. दुसरे असे की, निरनिराळ्या विद्याशाखांतील विषय शिकवण्याकरिता आवश्यक असलेली पाठ्यपुस्तके व संदर्भपुस्तके लिहिली गेली नव्हती. काही विद्यापीठांनी या दृष्टीने प्रयत्न केले होते, परंतु ते त्यांच्यापुरते व मर्यादित स्वरूपात होते. सर्व विद्यापीठांतून समान आणि एकरूप परिभाषा वापरली जावी, यासाठी शासनाने पुढाकार घेणे आवश्यक होते.

या सर्व गोष्टींचा सांगोपांग विचार करण्यासाठी महाराष्ट्रातील सर्व विद्यापीठांचे कुलगुरू व भाषा सल्लागार मंडळाचे सदस्य यांची एक संयुक्त बैठक शासनातर्फे आयोजित करण्यात आली. या बैठकीत भाषा संचालनालयाने विद्यापीठांतून शिकवल्या जाणाऱ्या सर्व विज्ञानविषयक व मानवविद्याविषयक विषयांची परिभाषा सर्व विद्यापीठांच्या सहकार्याने तयार करावी असे ठरले. संदर्भ ग्रंथांच्या व क्रमिक पुस्तकांच्या निर्मितीचे काम महाराष्ट्र राज्य पाठ्यपुस्तकनिर्मिती मंडळ आणि महाराष्ट्र राज्य विद्यापीठ ग्रंथनिर्मिती मंडळ या संस्थांनी हाती घेतले.

वरील निर्णयाच्या अनुरोधाने भाषा संचालनालयाने शास्त्रीय व मानविकी विद्याशाखांतील भौतिक, रसायन, गणित, अभियांत्रिकी यांसारख्या काही मूलभूत विषयांच्या उपसमित्या प्रथम स्थापन करून व काही निदेशक तत्त्वे ठरवून या कामाला सुरुवात केली. या उपसमित्यांवर सर्व विद्यापीठांचे प्रतिनिधी व विज्ञान परिषद इत्यादींसारख्या संस्थांचे प्रतिनिधी सदस्य म्हणून नेमण्यात आले. परिभाषानिर्मितीचे काम, अशा तऱ्हेचा हा पहिलाच प्रयत्न असल्याने, अत्यंत कठीण होते. शिवाय, ही परिभाषा केवळ प्रादेशिक स्तरापुरतीच मर्यादित न राहता अन्य भारतीय भाषांनाही ती स्वीकार्य होऊन अखिल भारतीय स्तरापर्यंत तिचा वापर होईल, हा दृष्टिकोन ठेवणेही आवश्यक होते. त्यामुळे ही परिभाषा केंद्र सरकारने तयार केलेल्या परिभाषेशी, मराठी भाषेच्या प्रकृतीला बाधा येणार नाही अशाप्रकारे मिळतीजुळती असावी असे धोरणही ठरविण्यात आले. या शब्दनिर्मितीकरिता मराठी भाषेत तोपर्यंत तयार झालेल्या इतर शास्त्रीय विषयांवरील शब्दकोशांचाही उपयोग करण्यात आला. ज्या ठिकाणी पर्यायांबाबत अडचण निर्माण झाली त्या ठिकाणी संस्कृत भाषेचा आधार घेणे अपरिहार्य ठरले.

आतापर्यंत भाषा संचालनालयाने गणित, रसायन, समाज, वाणिज्य, तत्त्वज्ञान व तर्कशास्त्र ग्रंथालय, शारीर व भूशास्त्र या विषयांवरील परिभाषा कोश प्रसिद्ध केले आहेत. तसेच, भौतिक शिक्षण, यंत्र अभियांत्रिकी, स्थापत्य अभियांत्रिकी, जीवशास्त्र, कृषि, अर्थशास्त्र, राज्यशास्त्र, धातु-शास्त्र, भूगोल, शरीरक्रिया, भाषाशास्त्र व साहित्य-समीक्षा या विषयांचे परिभाषानिर्मितीचे कामही पूर्ण झाले असून हे कोश यथावकाश प्रसिद्ध करण्यात येत आहेत. प्रस्तुत विद्युत अभियांत्रिकी परिभाषा कोश हा या प्रकल्पातील एक टप्पा आहे.

विद्युत अभियांत्रिकी विषयाबाबतच्या परिभाषानिर्मितीचे काम भाषा संचालनालयाने विद्युत अभियांत्रिकी उपसमिती नेमून हाती घेतले. महाराष्ट्रातील संबंधित विद्यापीठे, तंत्र शिक्षण संचालनालय, मराठी विज्ञान परिषद व शासकीय विभाग यांनी शिफारस केलेल्या तज्ञ प्राध्यापकांची किंवा इतर अधिकारी व्यक्तींची या उपसमितीवर नेमणूक करण्यात आली. उपसमितीने एकूण ८९ बैठकी घेऊन हे काम पूर्ण केले आणि सुमारे ९,१०० इंग्रजी पारिभाषिक संज्ञांचे मराठी पर्याय निश्चित केले.

या उपसमितीवरील मराठवाडा विद्यापीठाचे प्रतिनिधी प्रा. मा. ग. देशपांडे यांची बदली झाल्या-नंतर त्यांच्या जागी प्रा. गं. शं. पंडित यांनी काही काळ काम केले. तसेच, मराठवाडा विद्यापीठाचे पर्यायी सदस्य प्रा. र. पु. जोशी हे काही बैठकींना उपस्थित होते. पाटबंधारे व वीज विभागातर्फे श्री. द. स. तावरे हेही काही बैठकींना उपस्थित होते. त्याचप्रमाणे, उपसमितीच्या बैठकींना अभ्यागत म्हणून निरनिराळ्या विद्यापीठांचे संस्कृततज्ञ व त्या विषयाचे तज्ञ प्राध्यापक उपस्थित राहिले व त्यांनी या कामात मूल्यवान मदत केली.

उपसमितीवर भूतपूर्व भाषा संचालक, डॉ. वा. ना. पंडित, श्री. के. मा. आराध्ये व डॉ. वा. म. कुलकर्णी तसेच, भाषा उपसंचालक, डॉ. व. गो. अयाचित व श्री. य. शं. कानिटकर यांनी काम केले.

कोशाची अंतिम मुद्रिते तपासताना ज्या त्रुटी आढळून आल्या, त्यांच्या निराकरणार्थ एक विशेष बैठक घेण्यात आली. या बैठकीला प्रा. म. गो. धडफळे व प्रा. सि. द. पिंपरकर हे सदस्य उपस्थित होते. या दोन सदस्यांनी कोशाला अंतिम स्वरूप देताना बहुमोल मदत केली.

अशाप्रकारे अनेक तज्ञ व मान्यवर व्यक्तींच्या सहकार्याने तयार झालेला हा कोश या विषयाचे प्राध्यापक, लेखक व विद्यार्थी यांना, त्याचप्रमाणे, या विषयाची आस्था असणाऱ्या अन्य व्यक्तींना, तसेच, सर्व संबंधित शासकीय विभागांना उपयुक्त व मार्गदर्शक ठरेल असा विश्वास वाटतो.

**य. शं. कानिटकर**

भाषा संचालक व शासनाचे पदसिद्ध उपसचिव
सामान्य प्रशासन विभाग

## दोन शब्द

"विद्युत अभियांत्रिकी" या विषयाची परिभाषा निर्माण करण्यासाठी भाषा संचालनालयाने परिभाषा कोशाची प्रथम आवृत्ती मार्च १९८२ मध्ये छापली होती. आता या आवृत्तीचे पुनर्मुद्रण करण्यात आले आहे. प्रथम आवृत्तीप्रमाणेच विषयाच्या सुलभ आकलनासाठी, त्याचप्रमाणे या विषयावरील पाठ्यपुस्तके लिहिण्यासाठी या परिभाषा कोशाची मदत होईल, अशी आशा वाटते.

**न. ब. पाटील**
भाषा संचालक,
महाराष्ट्र राज्य.

मुंबई
दिनांक १७-९-८७

## भाषा सल्लागार मंडळाने वैज्ञानिक व तांत्रिक परिभाषेच्या निर्मितीसाठी आधारभूत म्हणून ठरवून दिलेली

## निदेशक तत्त्वे

१. **शब्दसंग्रह व पर्याय.**—हिंदी वैज्ञानिक व तांत्रिक परिभाषेची निर्मिती करताना केंद्र सरकारने ज्या धोरणाचा अवलंब करून विज्ञान शब्दावलीची रचना केली त्याच धोरणानुसार प्रत्येक विद्याशाखेतील शब्दांचे संकलन करावयाचे आहे. विज्ञान व तंत्र क्षेत्रांत यापूर्वी झालेल्या कार्याचा केंद्र सरकारने आढावा घेतला होता. तसेच हे कार्य करणाऱ्या निरनिराळ्या राज्यांतील निरनिराळ्या मंडळांमार्फत व समित्यांमार्फत या क्षेत्रात जे काम केले गेले त्याचाही समन्वय करण्याकडे केंद्र सरकारने लक्ष दिले होते. म्हणून प्रत्येक विद्याशाखेतील पारिभाषिक शब्दांचे संकलन करताना त्या त्या शाखेची केंद्र सरकारने तयार केलेली "विज्ञान शब्दावली" आधारभूत मानून, त्याबरोबरच पुणे विद्यापीठ, माध्यमिक शिक्षण मंडळ आणि इतर विज्ञान संस्था यांनी प्रकाशित केलेल्या पारिभाषिक शब्दावल्यांमधील शब्द व त्यांचे मराठी पर्याय यांचाही विचार करावा. माध्यमिक स्तरावर वैज्ञानिक व तांत्रिक विषयांचे मराठीतून शिक्षण देण्यासाठी तयार केलेल्या पाठ्यपुस्तकांद्वाराही पुष्कळशा तांत्रिक शब्दांचे पर्याय रूढ झाले आहेत. तेव्हा अशा पाठ्यपुस्तकांत वापरण्यात आलेले पर्यायदेखील विचारात घ्यावेत.

२. **आंतरराष्ट्रीय संज्ञा.**—'आंतरराष्ट्रीय संज्ञा' या शक्यतोवर त्यांच्या इंग्रजी स्वरूपातच ठेवाव्यात व त्यांचे मराठी भाषेत लिप्यंतरण करावे.

आंतरराष्ट्रीय संज्ञांत साधारणतः पुढील गोष्टींचा समावेश होतो :—

(अ) मूलद्रव्ये आणि संयुगे (महत्त्वपूर्ण पदे, उपपदे, वगैरेंसह) यांची नावे. ही नावे लिप्यंतरित करून देताना नावांपुढे त्यांची संकेतचिन्हेसुद्धा द्यावीत.

जसे :—हायड्रोजन (H), कार्बन (C)

मात्र मूलद्रव्ये आणि संयुगे यांसाठी वापरण्यात येणारी संकेतचिन्हे व संक्षेप इंग्रजी लिपीत जसेच्या तसेच ठेवावेत.

जसे :—किरणोत्सारी थोरिअमचा समस्थानीय $90th^{288}$ निकोटीन $C_{10}H_{14}N_2$

रासायनिक चिन्हांकित समीकरणे, त्यांची इंग्रजीतील संकेतचिन्हे जशीच्या तशी ठेवून पुढील-प्रमाणे द्यावीत :—

{सोडिअम बायसल्फेट} + {सोडिअम क्लोराईड} = {सोडिअम सल्फेट} + {हायड्रोक्लोरिक आम्ल}

$$NaHSO_4 + NaCl = Na_2SO_4 + HCl$$

गंधक, रुपे, तांबे, कथील, पारा, जस्त, शिसे इत्यादी रूढ शब्द वर्णनात तसेच रहावेत; परंतु रासायनिक संयुगांची नावे देताना त्यांच्या प्रचलित इंग्रजी नावांप्रमाणेच द्यावीत.

**(ब) वजने, मापे आणि परिमाणे.**

**जसे :—कॅलरी, ॲम्पिअर, वगैरे.**

(क) विशेषनामे व त्या नामांवरून घेतलेल्या संज्ञा मूळ भाषेतील त्यांच्या उच्चारानुरूप लिहाव्यात.

जसे :—फॅरनहीट श्रेणी (फॅरनहीट), व्होल्टमीटर (व्होल्टा), ॲम्पिअर (ॲम्पिअर).

(ड) वनस्पतिशास्त्र, प्राणिशास्त्र, भूशास्त्र इत्यादींसारख्या शास्त्रीय विषयांमधील द्विपद नामसंज्ञा.

(इ) रेडिओ, पेट्रोल, रडार, इलेक्ट्रॉन, न्यूट्रॉन, प्रोटॉन, यांसारखे नवीन शब्द.

(फ) गणित व इतर शास्त्रांमध्ये वापरण्यात येणारे संख्यांक, संकेतचिन्हे, सूत्रे वगैरे.

जसे :—Sin., Cos., Tan., Log..

तथापि, वर निर्दिष्ट केलेल्या पारिभाषिक संज्ञांपैकी पुष्कळशा संज्ञांना मराठीत योग्य पर्याय असून ते शाळा व महाविद्यालये इत्यादींत कित्येक वर्षांपासून रूढ झाले आहेत.

जसे :—ऑक्सिजन–प्राणवायु, कॅलरी–ऊष्मांक, Sin–ज्या, Cos–कोज्या वगैरे.

तेव्हा आंतरराष्ट्रीय संज्ञा त्यांच्या इंग्रजी स्वरूपात जशाच्या तशा लिप्यंतरित करून देताना त्याबरोबरच त्या संज्ञांना मराठीत रूढ असलेले पर्याय देखील द्यावेत.

३. जी संकेतचिन्हे असतील ती त्यांच्या आंतरराष्ट्रीय स्वरूपातच राहू द्यावीत. तथापि संज्ञांचे संक्षेप देवनागरी लिपीतून दर्शवावेत. Cm. म्हणजे "सेंटिमीटर", या संज्ञेचा संक्षेप सें.मी. असा देवनागरी लिपीत द्यावा.

४. वैज्ञानिक व तांत्रिक पारिभाषिक शब्दांसाठी पर्यायांची निश्चिती करताना, अर्थाची निश्चितता व सुबोधता यावर अधिक भर द्यावा व मराठी भाषेच्या प्रकृतीशी अविरोधी असे व शक्यतोवर भारतीय भाषांत वापरता येतील असेच पर्याय निवडावेत.

५. विवक्षित वैज्ञानिक शब्दांसाठी जे देशीय पर्याय मराठी भाषेत प्रचलित आहेत ते आणि सर्वसामान्यपणे वापरण्यात येणारे पर्याय तसेच राहू द्यावेत.

६. विदेशी भाषांमधील जे शब्द मराठी भाषेत प्रचलित आहेत ते तसेच ठेवावेत.

जसे :—मशीन, इंजिन, मीटर, लिटर, वगैरे.

७. हे पर्याय मराठी व्याकरणानुसार प्रातिपदिक रूपांत द्यावेत.

८. मिश्र शब्दांची निर्मिती.—वैज्ञानिक परिभाषा तयार करताना Pasteurisation "पाश्चरीकरण", Voltage "व्होल्टता" अशांसारखे मिश्र शब्द बनवणे, हे भाषेच्या स्वाभाविक प्रवृत्तीस अनुसरून असल्यामुळे गरजेनुसार असे शब्द तयार करावेत.

९. जरूर तेथे समानार्थी पारिभाषिक शब्दांची कुळे लक्षात घेऊन पारिभाषिक शब्द निश्चित करावेत.

# कोशपरिचय

## कोशाचे स्वरूप इंग्रजी पारिभाषिक संज्ञा व तिचा मराठी पर्याय असे आहे

**इंग्रजी शब्द व शब्दानुक्रम.**—इंग्रजी शब्द देताना मुख्यत्वेकरून Chambers's Technical Dictionary व Webster's New International Dictionary यांचा, तसेच या विषयाशी संबंधित असलेल्या अन्य कोशांचा, वर्णलेखन (Spelling) इत्यादींसाठी आधार घेतला आहे.

**इंग्रजी शब्दजाती.**—प्रत्येक एकेरी संज्ञेपुढे तिची शब्दजाती दर्शविली आहे. जसे *n.*, *adj.* *v.t.*, *v.i.* इत्यादी. इंग्रजी दोन किंवा अधिक शब्द असलेल्या संज्ञेपुढे शब्दजाती दर्शवलेली नाही.

**विषयनिर्देशक संक्षेप.**—एखादी इंग्रजी पारिभाषिक संज्ञा विशिष्ट पोटविषयाशी संबंधित असेल तर पर्याय देण्यापूर्वी तो विवक्षित विषय दर्शवणारा संक्षेप इंग्रजी इटालिक मुद्राक्षरांत दिला आहे.

**पर्याय, अर्थच्छटा, स्पष्टीकरणे.**—इंग्रजी संज्ञेपुढे शब्दजाती, विषयनिर्देशक संक्षेप (असल्यास) दिल्यानंतर तिचे एक किंवा अधिक मराठी पर्याय दिले आहेत. पर्याय देताना दोन वेगवेगळ्या अर्थच्छटा असल्यास त्यांना क्रमांक दिले आहेत. काही ठिकाणी अर्थ अधिक स्पष्ट व्हावा म्हणून पर्यायांपूर्वी कंसात इंग्रजी स्पष्टीकरण दिले आहे किंवा काही ठिकाणी पर्यायानंतर कंसात मराठी स्पष्टीकरणही दिले आहे. पर्यायांचा वापर यथार्थपणे व्हावा यासाठी आवश्यक तेथे कंसात " as in " असे देऊन त्या पर्यायाचा उपयोग करून दाखवला आहे.

**मराठी शब्दजाती.**—इंग्रजी संज्ञेपुढे शब्दजाती दर्शवली असल्याने व त्यानुसार मराठी पर्याय घेतला असल्याने मराठी शब्दजाती वेगळी दर्शवली नाही.

**लिंगनिर्देश.**—(१) प्रत्येक मराठी एकेरी पर्यायापुढे, तो नाम असल्यास लिंगनिर्देश केला आहे. जसे (पु.), (स्त्री.), (न.) इत्यादी. (२) इंग्रजी संज्ञा एकेरी असल्यास तिचा जोडशब्द असलेल्या मराठी पर्यायांपुढे लिंगनिर्देश केला आहे. (३) इंग्रजी अनेकवचनी जोडशब्दाच्या मराठी पर्यायापुढेही लिंगनिर्देश केला आहे.

**शब्दकुळे.**—शब्दकुळांतील शब्दांची आधारभूत कल्पना एकच असते, परंतु त्यांतील शब्द सूक्ष्म अर्थच्छटा व्यक्त करून आपली भिन्नता दर्शवतात. असे शब्द त्यांतल्या महत्त्वाच्या शब्दांखाली पर्यायानंतर *cf.* असे दर्शवून एकत्रितपणे दिले आहेत. तसेच त्या शब्दकुळातील शब्द, कोशात त्यांच्या वर्णानुक्रमानुसार योग्य त्या ठिकाणी दिले आहेत व तिथे *cf.* असे म्हणून ज्या इंग्रजी संज्ञेखाली हे कूळ आले आहे त्या इंग्रजी संज्ञेचा निर्देश केला आहे. उदा. पृ. १ वरील *acceleration* हे कूळ पहावे. अशा तऱ्हेने शब्दकुळाखाली सर्व शब्द एकत्र आणण्याच्या या पद्धतीचा अभ्यासकांना उपयोग होऊ शकेल.

**जोडसंज्ञा.**—काही महत्त्वाच्या पारिभाषिक जोडसंज्ञांखाली या संज्ञांतील इतर महत्त्वाचे प्रकार दर्शवणाऱ्या संज्ञा एकत्र आणल्या आहेत. उदा. पृ. २९ वरील connection ही संज्ञा. याही पद्धतीचा अभ्यासकांना उपयोग होऊ शकेल.

**समानार्थी शब्द.**—काही इंग्रजी शब्द जवळजवळ समानार्थी असल्याने त्यांना मराठी पर्याय देताना हे शब्द समानार्थी आहेत हे दर्शवण्यासाठी एकाच ठिकाणी दिले आहेत. ज्या शब्दासमोर पर्याय दिला आहे त्या शब्दासमोर कंसात (*also* ......) असे देऊन दुसरा समानार्थी शब्द दर्शवला आहे व कंसातील शब्द त्याच्या वर्णानुक्रमानुसार ज्या ठिकाणी आला असेल त्या ठिकाणी त्या शब्दासमोर = अशी खूण दर्शवून पर्याय ज्या शब्दासमोर दिला आहे तो शब्द दर्शवला आहे. त्याचप्रमाणे वर्णलेखनात (Spelling) थोडा फेरफार असलेले इंग्रजी शब्दही वरील पद्धतीनेच दर्शवण्यात आले आहेत.

# विद्युत अभियांत्रिकी

## संक्षेप सूची

| | | |
|---|---|---|
| *abbr.* | .. | **Abbreviation** |
| *adj.* | .. | **Adjective** |
| *cf.* | .. | **Compare** |
| *Chem.* | .. | **Chemistry** |
| *Maths.* | .. | **Mathematics** |
| *Met.* | .. | **Metallurgy** |
| *Min.* | .. | **Mineral** |
| *n.* | .. | **Noun** |
| *pfx.* | .. | **Prefix** |
| *Phys.* | .. | **Physics** |
| *pl.* | .. | **Plural** |
| *sing.* | .. | **Singular** |
| *v.i.* | .. | **Verb, Intransitive** |
| *v.t.* | .. | **Verb, Transitive** |
| *v.t. and i.* | .. | **Verb, Transitive and Intransitive** |

# विद्युत अभियांत्रिकी परिभाषा कोश

## A

**a,** (*also* A) (commonly used abbreviation for ampere) ॲम्प

**ab,** *pfx*. (as, *abbr*. of *absolute* used for a cgs. electromagnetic unit) ॲब– (निरपेक्ष) (as in : abohm ॲबोम, निरपेक्ष ओम)

**abampere,** *n*. ॲबॅम्पिअर (पु.)

**A-battery,** *n*. A-बॅटरी (स्त्री.), ए-बॅटरी (स्त्री.)

**aberration,** *n*. विपथन (न.)

**abnormal,** *adj*. १ अपसामान्य २ असामान्य

**abnormal behaviour of ionosphere,** आयनावरणाचे अपसामान्य वर्तन

**abohm,** *n*. ॲबोम (पु.), निरपेक्ष ओम (पु.)

**absolute,** *adj*. निरपेक्ष

**absolute ampere,** निरपेक्ष ॲम्पिअर

**absolute constant,** निरपेक्ष स्थिरांक

**absolute electrometer,** निरपेक्ष विद्युतमापी

**absolute galvanometer,** निरपेक्ष गॅल्व्हानोमापी

**absolute measuring instrument,** निरपेक्ष मापन उपकरण

**absolute permeability,** निरपेक्ष पार्यता

**absolute system of units,** निरपेक्ष एकक पद्धति

**absolute unit,** निरपेक्ष एकक

**absorber,** *n*. १ अवशोषक (पु.), अवशोषी (पु.) २ शोषक (पु.)

**absorber circuit,** अवशोषी परिपथ

**absorption,** *n*. १ अवशोषण (न.) २ शोषण (न.)

**absorption coefficient,** (*also* extinction coefficient) १ अवशोषण गुणांक २ शोषण गुणांक

**absorption factor,** शोषणांक (पु.)

**a. c.,** (*also* A. C.) (*abbr*. for alternating current) प्र. धा. (प्रत्यावर्ती धारा)

**accelerate,** *v.t. & i.* १ त्वरण करणे २ त्वरण होणे

**accelerating,** *adj*. त्वरक, त्वरण–

**accelerating anode.** त्वरक ॲनोड, त्वरक धनाग्र

**accelerating contactor,** त्वरक संपर्कित्र

**accelerating current,** त्वरक धारा

**accelerating period,** (*also* notching-up period) त्वरण अवधि

**accelerating relay,** त्वरक पुनरेषी

**accelerating weight,** त्वरक भार, त्वरक वजन

**acceleration,** *n*. त्वरण (न.)
*cf.* speed, चाल
velocity, वेग

**accessory,** *n*. उपसाधन (न.)

**accommodation of eye,** नेत्र समायोजन

**accumulator,** *n*. संचायक (पु.), संचयी (पु.)

**accumulator box,** संचयी पेटी

**accumulator grid,** संचयी जाळी, संचयी ग्रिड

**accumulator insulator,** संचायक निरोधी

**accumulator traction,** संचयी संकर्षण

**a. c. d. c. impedance ratio,** प्र. धा. दि. धा. संरोध गुणोत्तर (प्रत्यावर्ती धारा दिष्ट धारा संरोध गुणोत्तर)

**a. c. d. c. receiver,** प्र. धा. दि. धा. ग्राही (प्रत्यावर्ती धारा दिष्ट धारा ग्राही)

acetate wire, ॲसिटेट तार
a. c. generator, प्र. धा. जनित्र (प्रत्यावर्ती धारा जनित्र)
Acheson furnace, ॲचेसन भट्टी
achromatic lens, अवर्णी भिंग
achromatic sensation, अवर्णी संवेदन
acid-proof, *adj.* आम्लरक्षित
acoustic=acoustical, *adj.* १ श्रवणविषयक २ ध्वनिविषयक, ध्वनि– ३ ध्वनिकीय, ध्वनिक
acoustically compensated volume control, १ श्रवण प्रतिपूरित ध्वनिमान नियंत्रण २ श्रवण प्रतिपूरित ध्वनिमान नियंत्री
acoustic delay, ध्वनिक विलंब
acoustic horn, ध्वनिक शिंग
acoustic impedance, ध्वनिक संरोध
acoustic labyrinth, ध्वनिक व्यूह
acoustics, *n.* १ (the science of sound, including its production, transmission and effects) ध्वनिकी (स्त्री.) २ ध्वनिव्यवस्था (स्त्री.)
a. c. plate resistance, प्र. धा. ॲनोड रोध (प्रत्यावर्ती धारा ॲनोड रोध), प्र. धा. धनाग्र रोध (प्रत्यावर्ती धारा धनाग्र रोध)
A. C. S. R. conductor, पो. प्र. ॲ. वाही (पोलाद प्रबलित ॲल्युमिनिअमवाही)
actinic efficiency, क्रियाशील कार्यक्षमता
actinotherapy, *n.* ॲक्टिनोचिकित्सा (स्त्री.)
activated electrode, सक्रियित इलेक्ट्रोड, सक्रियित विद्युताग्र
activation, *n.* सक्रियीकरण (न.)
activator, *n.* सक्रियक (पु.)
active, *adj.* सक्रिय, क्रियाशील
active component of voltage, व्होल्टतेचा सक्रिय घटक
active component of volt-amperes, व्होल्ट-ॲम्पिअरांचा सक्रिय घटक
active current, सक्रिय धारा
active electrode, सक्रिय इलेक्ट्रोड, सक्रिय विद्युताग्र
active element, सक्रिय घटक
active material, सक्रिय पदार्थ, क्रियाशील पदार्थ
active network, सक्रिय जालव्यूह
active power, सक्रिय शक्ति
active voltage, सक्रिय व्होल्टता
active volt-ampere, सक्रिय व्होल्ट-ॲम्पिअर
active wire, सक्रिय तार
actual, *adj.* वास्तविक, वास्तव
actual antenna, वास्तविक आकाशग
actual tooth flux, वास्तव दंत अभिवाह
actuate, *v.t.* चालना देणे
actuated, *adj.* चालित
actuated by spring, स्प्रिंग चालित
acuity, *n.* तीक्ष्णता (स्त्री.)
acyclic generator, अचक्रीय जनित्र
adaptation, *n.* अनुकूलन (न.)
adapter, *n.* अनुकूलक (पु.)
adapter transformer, अनुकूलक परिवर्तित्र
Adcock antenna, ॲडकॉक आकाशग
Adcock direction-finder, ॲडकॉक दिशा शोधी
adhesion, *n.* आसंग (पु.), आसंजन (न.)
adhesion coefficient, आसंजन गुणांक
adhesive tape, आसंजी फीत
adhesive weight, आसंजी भार, आसंजी वजन
adjacent, *adj.* सन्निध, निकटवर्ती
adjacent channel, सन्निध प्रणाल
adjacent channel interference, सन्निध प्रणाल व्यतिकरण
adjacent channel interference ratio, सन्निध प्रणाल व्यतिकरण गुणोत्तर
adjust, *v.t.* अनुयोजन करणे
adjustable, *adj.* अनुयोज्य
adjustable ratio transformer, अनुयोज्य गुणोत्तर परिवर्तित्र
adjustable speed motor, अनुयोज्य चाल चलित्र

**adjustable varying speed motor,** अनुयोज्य परिवर्ती चाल चलित्र
**adjuster,** *n.* (*also* adjustor) अनुयोजी (पु.)
**adjusting,** *adj.* अनुयोजी, अनुयोजक–
**adjusting tool,** अनुयोजी हत्यार
**adjustment,** *n.* अनुयोजन (न.)
**adjustor** = adjuster
**admittance,** *n.* संवहन (न.)
*cf.* conductance, प्रवहन
inductance, प्रेरितता
susceptance, प्रतिवहन
**adpedance,** *n.* (*admittance* + *impedance*) संवहरोध (पु.) (संवहन+संरोध)
**advance,** *adj.* अग्रिम
*n.* १ अग्रिम (न.) २ अग्रेसरण (न.)
**advancer,** *n.* अग्रित्र (न.)
**advance wire,** अग्रिम तार
**aerial,** *n.* आकाशग (पु.), एरिअल (स्त्री.)
*adj.* वायवीय, हवाई
**aerial array,** आकाशग विन्यास
**aerial cable,** हवाई केबल
**aeronautical,** *adj.* वैमानिक, विमान–
**aeronautical fixed station,** वैमानिक स्थिर स्थानक
**aeronautical mobile station,** वैमानिक फिरते स्थानक
**aeronautical station,** वैमानिक स्थानक
**a. f.,** (*also* **A.F.**) (*abbr.* for audio frequency) श्रु. वा. (श्रुति वारंवारता)
**A. F. C.,** (*abbr.* for automatic frequency control) स्व. वा. नि. (स्वयंचलित वारंवारता नियंत्रण)
**afterglow,** *n.* पश्चप्रभा (स्त्री.)
**ageing,** *n.* १ कालप्रभावन (न.) २ कालप्रभाव (पु.)
**ageing test,** कालप्रभाव चाचणी
**a. h. m.,** (*abbr.* for ampere-hour meter) अॅ. ता. मा. (अॅम्पिअर तास मापी)

**air,** *n.* हवा (स्त्री.), वात (पु.)
**air blast,** वातझोत (पु.)
**air-blast circuit breaker** = air-blast switch, वातझोत परिपथ वियोजी, वातझोत स्विच
**air-blast transformer,** वातझोत परिवर्तित्र
**air brake,** वात आरोधी
**air-break circuit,** वात वियोजन परिपथ
**air-break circuit breaker** = air break switch, वात वियोजन परिपथ वियोजी, वात वियोजन स्विच
**air calorimeter test,** वात कॅलरीमापी चाचणी
**air-cell,** *n.* वातकोष्ठ (न.)
**air circuit breaker,** वात परिपथ वियोजी
**air circulating oven,** वात परिसंचारी आवा, वात परिसंचारी गरम पेटी
**air circulator,** वात परिसंचारी
**air-condenser,** *n.* वातधारी (पु.)
**air-conditioning plant,** वातानुकूलन संयंत्र
**air-cooled,** *adj.* वातशीतित
**air-cooled power tube,** वातशीतित शक्ति नलिका
**air-cooling,** *n.* वातशीतन (न.)
**air-core,** *n.* वातक्रोड (पु.)
**air-core choke,** वातक्रोड चोक
**air-core coil,** (*also* air-cored coil) वातक्रोड कुंडल
**air-cored,** *adj.* वातक्रोड–
**air-cored coil** = air-core coil
**air-core inductor,** वातक्रोड प्रेरणी
**air-core transformer,** वातक्रोड परिवर्तित्र
**aircraft antenna,** वायुयान आकाशग
**air dielectric,** वात पराविद्युत
**air duct,** वात वाहिनी
**air friction,** वात घर्षण
**air-friction damping,** वातघर्षण अवमंदन
**air-gap,** *n.* वात-अंतर (न.)
**air-gap factor,** वात-अंतर अंक
**air-gap field,** वात-अंतर क्षेत्र
**air-gap line,** वात-अंतर रेखा

air handling unit, वात व्यवहार संच
air horn, वात शिंग
air-insulated, *adj.* वातनिरोधित
air-insulated switch gear, वातनिरोधित स्विच उपस्कर
air leak, १ वातगल (पु.) २ वातगलन (न.)
air-pipe, *n.* वातनलिका (स्त्री.)
airplane effect, विमान प्रभाव
airport surveillance radar, विमानतळ संनिरीक्षण रडार
air-pump, *n.* हवापंप (पु.)
air traffic, हवाई वाहतूक
air traffic control, हवाई वाहतूक नियंत्रण
air washer, वायु वॉशर
Ajax-Wyatt furnace, अजॅक्स-व्यॉट भट्टी
alarm, *n.* १ भयसूचना (स्त्री.) २ गजर (पु.) ३ इशारा (पु.)
alarm circuit, भयसूचना परिपथ
alarm contact, भयसूचना संपर्क
alarm device, भयसूचना साधन
alarm equipment rack, भयसूचना सामग्री निलय
alarm fuse, भयसूचना वितळतार
alarm lamp, भयसूचक दीप
alarm system, भयसूचना पद्धति
Aldrey, *n.* आल्ड्रे (पु., न.)
align, *v.t.* संरेखन करणे
aligning, *adj.* संरेखी
aligning condenser, संरेखीधारी (पु.), संरेखी संधारित्र
aligning tool, संरेखी हत्यार
alignment, *n.* संरेखन (न.)
alignment of receiver, ग्राही संरेखन
alive, *adj.* जागृत
alkali, *n.* अल्क (न.)
alkali metal, अल्क धातु
alkaline, *adj.* अल्कधर्मी, अल्क–
alkaline accumulator, अल्क संचायक, अल्क संचयी
alkaline cell, अल्क घट
all-day efficiency, पूर्ण-दिन कार्यक्षमता
all-electric operation, पूर्ण-विद्युत परिकर्म
all-electric signalling, पूर्ण-विद्युत संकेतन
Allen's loop test, अॅलन लूप चाचणी
all-insulated switch, पूर्ण-निरोधित स्विच
all in tariff, सर्वंकष प्रशुल्क
allocation, *n.* नियतन (न.)
allowance, *n.* मोकळीक (स्त्री.) *cf.* clearance
alloy, *n.* मिश्रधातु (पु.)
all-pass, *n.* सर्व-पार (पु.)
all-pass filter, सर्व-पार गाळणी
all-pass network, सर्व-पार जालव्यूह
all-pole function, सर्व-ध्रुव फल
all-wave antenna, सर्व-तरंग आकाशग
all-wave receiver, सर्व-तरंग ग्राही
all-wave tuning coil, सर्व-तरंग मेलन कुंडल
Almalec, *n.* अल्मालेक (पु., न.)
alphanumeric field, वर्णांक क्षेत्र
alteration of poles and zeroes, ध्रुव-शून्यांचे एकांतरण
alternate channel interference, एकांतर प्रणाल व्यतिकरण
alternating, *adj.* १ प्रत्यावर्ती २ एकांतर–
alternating current, ( *abbr.* a. c.) प्रत्यावर्ती धारा (प्र. धा.)
alternating current bridge, प्रत्यावर्ती धारा सेतु
alternating current electromagnet, प्रत्यावर्ती धारा विद्युतचुंबक
alternating current exciter, प्रत्यावर्ती धारा उत्तेजित्र
alternating current generator, प्रत्यावर्ती धारा जनित्र
alternating current relay, प्रत्यावर्ती धारा रिले

**alternating current series motor,** प्रत्यावर्ती धारा श्रेणी चलित्र
**alternating current transformer,** प्रत्यावर्ती धारा परिर्वातित्र
**alternation,** *n.* १ प्रत्यावर्तन (न.) २ एकांतरण (न.)
**alternator,** *n.* प्रत्यावर्तित्र (न.)
**altimeter,** *n.* उंचीमापी (पु.)
**Aludur,** *n.* अलुडर (पु., न.)
**aluminium,** *n.* (*also* aluminum) ॲल्युमिनिअम (न.)
**aluminium anode cell,** ॲल्युमिनिअम ॲनोड घट, ॲल्युमिनिअम धनाग्र घट
**aluminium arrester,** ॲल्युमिनिअम प्रग्राही
**aluminium leaf electroscope,** ॲल्युमिनिअम पत्र विद्युतदर्शी
**aluminium solder,** ॲल्युमिनिअम झाळ
**aluminium steel cable,** ॲल्युमिनिअम पोलाद केबल
**aluminum** = aluminium
**amateur,** *adj.* अव्यवसायी, अनुरागी
**amateur call letter,** अनुरागी संज्ञा अक्षर
**amateur frequency band,** अव्यवसायी वारंवारता पट्ट
**amateur service,** अव्यवसायी सेवा
**ambient temperature,** परिवात तापमान
**ammeter,** *n.* (*also* ampere-meter) ॲम्पिअरमापी (पु.), ॲमीटर (पु.)
**ammeter shunt,** ॲमीटर पार्श्वपथ
**amortisseur,** *n.* अवमंदन कुंडल (न.)
**amperage,** *n.* ॲम्पिअरता (स्त्री.)
**ampere,** *n.* ॲम्पिअर (न.)
**ampere arc,** ॲम्पिअर प्रज्योत
**ampere-balance,** *n.* ॲम्पिअरतुला (स्त्री.)
**ampere-conductor,** *n.* ॲम्पिअरवाही (पु.)
**ampere-foot,** *n.* ॲम्पिअर पाद (पु.)
**ampere-hour,** *n.* ॲम्पिअर तास (पु.)
**ampere-hour capacity,** ॲम्पिअर तास क्षमता
**ampere-hour efficiency,** ॲम्पिअर तास कार्यक्षमता
**ampere-hour meter,** (A.H.M.) ॲम्पिअर तासमापी
**ampere-meter** = ammeter
**ampere-minute,** *n.* ॲम्पिअर मिनिट (न.)
**ampere-second,** *n.* ॲम्पिअर सेकंद (पु.)
**Ampere's rule,** ॲम्पिअरचा नियम
**Ampere's theory of magnetisation,** ॲम्पिअरचा चुंबकत्व सिद्धांत
**ampere-turn,** *n.* (A.T.) ॲम्पिअर वेढा (पु.)
**amphoteric substance,** उभयधर्मी पदार्थ
**amplidyne,** *n.* ॲम्प्लिडाइन (पु.)
**amplidyne generator,** ॲम्प्लिडाइन जनित्र
**amplification,** *n.* प्रवर्धन (न.)
**amplification coefficient** = amplification factor, प्रवर्धन गुणांक, प्रवर्धनांक (पु.)
**amplifier,** *n.* प्रवर्धी (पु.)
  cathode-follower amplifier, कॅथोड-अनुगामी प्रवर्धी
  degenerative amplifier, अपजनन प्रवर्धी
  feedback amplifier, पश्चप्रदाय प्रवर्धी
  grounded anode amplifier, भूसंपर्कित ॲनोड प्रवर्धी
  grounded cathode amplifier, भूसंपर्कित कॅथोड प्रवर्धी
  grounded grid amplifier, भूसंपर्कित ग्रिड प्रवर्धी
  low-frequency amplifier, निम्न-वारंवारता प्रवर्धी
  quiescent push-pull amplifier, शांत ढकल-ओढ प्रवर्धी
  stagger-tuned amplifier, सांतर-मेलित प्रवर्धी
  television amplifier, दूरचित्रवाणी प्रवर्धी
**amplifier band-width,** प्रवर्धी पट्ट-रुंदी
**amplify,** *v.t. & i.* १ प्रवर्धित करणे २ प्रवर्धित होणे

amplifying, *adj.* प्रवर्धनी, प्रवर्धन–
amplifying unit, प्रवर्धनी संच, प्रवर्धक संच
amplitude, *n.* आयाम (पु.)
amplitude control, आयाम नियंत्रण
amplitude distortion, आयाम विकृति
amplitude factor = crest factor
amplitude frequency response characteristic, आयाम वारंवारता अनुक्रिया अभिलक्षण
amplitude modulated detector, आयाम आपरिवर्तित शोधी
amplitude modulated noise, आयाम आपरिवर्तित कुरव
amplitude modulation, (a. m.) आयाम आपरिवर्तन
amplitude modulation radio, (a. m. radio) आयाम आपरिवर्तन रेडिओ (आ. आ. रेडिओ)
amplitude modulation receiver, (a. m. receiver), आयाम आपरिवर्तन ग्राही (आ. आ. ग्राही)
amplitude modulus, आयाम मापांक
amplitude resonance, आयाम संस्पंदन
amplitude selector, आयाम वरणी
analogous quantity, सदृश राशि
analogue computor, सादृश्य संगणित्र
analyse, *v.t.* विश्लेषण करणे
analyser, *n.* विश्लेषी (पु.)
analysing diagram, विश्लेषी आकृति
analysis, *n.* विश्लेषण (न.)
anchor, *n.* स्थिरक (पु.)
anchor clamp, स्थिरक पकड
anchor ear, स्थिरक कर्ण
anchoring, *n.* स्थिरक टाकणे (न.), स्थिरकन (न.)
anchoring of conductor rail, वाही रुळाचे स्थिरकन
anchor pole, स्थिरक खांब
anchor tower, स्थिरक मनोरा

Anderson's bridge, अँडरसन सेतु
AND gate, 'व' द्वार, 'अँन्ड' द्वार
angle, *n.* कोन (पु.)
angle of friction, घर्षण कोन
angle of helix, हेलिक्स कोन
angle of incidence, आपतन कोन
angle of lag, पश्चता कोन, पश्च कोन
angle of lead, अग्रता कोन, अग्र कोन
angle of polarisation, ध्रुवण कोन
angle of torsion, मोटन कोन
angle support, कोन आधार
Angstrom unit, अँगस्ट्रॉम एकक
angular, *adj.* कोनीय
angular alignment, कोनीय संरेखन
angular deviation, कोनीय विचलन
angular difference, कोनीय अंतर
angular dispersion, कोनीय अपस्करण, कोनीय विकिरण
angular frequency, कोनीय वारंवारता
angular play, कोनीय माया
angular velocity, कोनीय वेग
anion, *n.* अॅनायन (न.)
anisotropic conductivity, विषमदिक् वाहकता
anneal, *v.t. & i.* अनुशीतन करणे, अनुशीतन होणे
annealed copper, अनुशीतित तांबे
annealed wire, अनुशीतित तार
annual load factor, वार्षिक भारांक
annunciator, *n.* अभिसूची (पु.)
anode, *n.* अॅनोड (पु.), धनाग्र (न.)
anode bend rectification, अॅनोड वलन दिष्टीकरण, धनाग्र वलन दिष्टीकरण
anode bend rectifier, अॅनोड वलन दिष्टकारी, धनाग्र वलन दिष्टकारी
anode current, अॅनोड धारा, धनाग्र धारा
anode dissipation, अॅनोड अपाकरण, धनाग्र अपाकरण

**anode effect,** अ‍ॅनोड प्रभाव, अ‍ॅनोड परिणाम, धनाग्र प्रभाव, धनाग्र परिणाम
**anode efficiency,** अ‍ॅनोड कार्यक्षमता, धनाग्र कार्यक्षमता
**anode feed,** अ‍ॅनोड प्रदाय, धनाग्र प्रदाय
**anode input power,** (*also* plate input power) अ‍ॅनोड आदान शक्ति, धनाग्र आदान शक्ति
**anode load,** अ‍ॅनोड भार, धनाग्र भार
**anode modulation,** (*also* plate modulation) अ‍ॅनोड आपरिवर्तन, धनाग्र आपरिवर्तन
**anode modulator,** अ‍ॅनोड आपरिवर्ती, धनाग्र आपरिवर्ती
**anode power,** अ‍ॅनोड शक्ति, धनाग्र शक्ति
**anodic etching,** अ‍ॅनोडी खातन, धनाग्र खातन
**anodic oxidation,** अ‍ॅनोडी ऑक्सिडीकरण, धनाग्र ऑक्सिडीकरण
**anodic treatment,** अ‍ॅनोडी परिकर्म, धनाग्र परिकर्म
**anolyte,** *n.* अ‍ॅनोलाइट (पु.)
**anomalous magnetisation,** असंगत चुंबकीकरण
**antenna,** *n.* आकाशग (पु.), अ‍ॅटेना (पु.)
  **Adcock antenna,** अ‍ॅडकॉक आकाशग
  **aperiodic antenna,** अनावर्ती आकाशग
  **artificial antenna,** कृत्रिम आकाशग, निष्कर्म आकाशग
  **Beverage antenna,** तरंग आकाशग, बिवरेज आकाशग
  **cage antenna,** पंजर आकाशग
  **coil antenna,** कुंडल आकाशग, लूप आकाशग, चौकट आकाशग
  **counterpoise antenna,** प्रतितोल आकाशग
  **diamond antenna,** चौकट आकाशग
  **directional antenna,** दिशात्मक आकाशग
  **diversity antenna,** विविधता आकाशग
  **dummy antenna** = artificial antenna
  **fan antenna,** पंखा आकाशग
  **flat-top antenna,** सपाट माथा आकाशग
  **inverted-L antenna,** व्यस्त-L आकाशग
  **inverted-V antenna,** व्यस्त-V आकाशग
  **multiwire antenna,** बहुतार आकाशग
  **unidirectional antenna,** एकदिक आकाशग
  **unloaded antenna,** भारहीन आकाशग
  **wave antenna** = Beverage antenna
**antenna and reflector,** आकाशग आणि परावर्ती
**antenna array,** आकाशग विन्यास
**antenna capacitance,** आकाशग धारिता
**antenna condenser,** आकाशग संधारित्र
**antenna effect,** आकाशग प्रभाव, आकाशग परिणाम
**antenna element,** आकाशग भाग
**antenna for broadcast frequencies,** परिक्षेपण वारंवारता आकाशग
**antenna housing,** आकाशग निवसन
**antenna impedance,** आकाशग संरोध
**antenna involving parasitic radiators,** अवांछित प्रारीयुक्त आकाशग
**antenna lobe,** आकाशग पालि
**antenna radiating element,** आकाशग प्रारण भाग
**antenna radiation resistance,** आकाशग प्रारण रोध
**antenna resistance,** आकाशग रोध
**antenna shield,** आकाशग परिरक्षी
**antenna system,** आकाशग संस्था
**anticlockwise,** *adj.* प्रतिघटि, प्रतिघटिवत्
**antifatigue device,** प्रतिश्रांति साधन
**anti-neutrino,** *n.* प्रतिशून्यका (स्त्री.), प्रतिन्यूट्रिनो (पु.)
**antinode,** *n.* प्रतिनिस्पंद (पु.)
**antiphase,** *adj.* प्रतिप्रावस्थी
**anti-polarising winding,** १ प्रतिध्रुवीकरण कुंडलन, प्रतिध्रुवण कुंडलन २ प्रतिध्रुवीकरण कुंडल, प्रतिध्रुवण कुंडल
**anti-resonance,** *n.* प्रतिसंस्पंदन (न.)

anti-sing circuit, गानरोधी परिपथ
anti-spray film, प्रतितुषार तवंग
anti-vibration device, प्रतिकंपन साधन
aperiodic, *adj.* अनावर्ती
aperiodic antenna, अनावर्ती आकाशग
aperiodic circuit, अनावर्ती परिपथ
aperiodic function, अनावर्ती फल
aperiodicity, *n.* अनावर्तिता (स्त्री.)
apex, *n.* १ शिरोबिंदु (पु.) २ शिखाग्र (न.)
apex angle, शिरोकोन (पु.)
apostilb, *n.* ॲपॉस्टिल्ब (न.)
apparatus, *n.* १ उपकरण (न.) २ उपकरण-संच (पु.)
apparent, *adj.* आभासी
apparent brightness, आभासी द्युति
apparent power, आभासी शक्ति
appliance, *n.* १ (as, a device) साधन (न.) २ (as, an instrument) साधित्र (न.)
applied pressure, प्रयुक्त दाब, लावलेला दाब
approach zone, पोच क्षेत्र
apron floodlight, तल झोतदीप
Aquadag, *n.* ॲक्वाडाग (न.)
Arägo's disc, ॲरॅगोची चकती
arbitrary, *adj.* स्वेच्छ
arbitrary constant, स्वेच्छ स्थिरांक
arc, *n.* प्रज्योत (स्त्री.)
arc brazing, प्रज्योत पिझाळण
arc control device, प्रज्योत नियंत्रण साधन
arc crater, प्रज्योत खळी
arc deflector, प्रज्योत विक्षेपक
arc discharge, प्रज्योत निर्भारण
arc duration, प्रज्योत अवधि
arc extinguisher, प्रज्योत शामक
arc furnace, प्रज्योत भट्टी
arcing, *n.* प्रज्योतन (न.)
arcing contact, (*also* arcing tips) प्रज्योतन संपर्क
arcing ground, प्रज्योत भूसंपर्कन
arcing-ground suppressor, प्रज्योत भूसंपर्क दमनकारी
arcing horn, प्रज्योतन शृंग
arcing ring, प्रज्योतन वलय
arcing shield, प्रज्योतन परिरक्षी
arcing tips = arcing contact
arcing voltage, प्रज्योतन व्होल्टता
arc lamp, प्रज्योत दीप
arc-lighting dynamo, प्रज्योत प्रकाश जनित्र
arc-over, *n.* प्रज्योतन (न.)
arc-over voltage, प्रज्योतन व्होल्टता
arc rectifier, प्रज्योत दिष्टकारी
arc stream voltage, प्रज्योत वाह व्होल्टता
arc suppression coil, प्रज्योत दमन कुंडल
arc suppressor, प्रज्योत दमनकारी
arc tube, प्रज्योत नलिका
arc voltage, प्रज्योत व्होल्टता
arc welding, प्रज्योत सांधण
area, *n.* क्षेत्र (न.)
area of illumination, दीपन क्षेत्र
Argand diagram, आर्गंड आकृति
argon glow lamp, आर्गन प्रभा दीप
argon lamp, आर्गन दीप
argument of a function, १ फलाचा चलनांक २ फलाचा कोनांक
arm, *n.* भुज (पु.)
armature, *n.* आर्मेचर (पु.)
armature bands, आर्मेचर बंध (पु.अ.व.)
armature bars, आर्मेचर शलाका (स्त्री.अ.व.)
armature circuit, आर्मेचर परिपथ
armature coil, आर्मेचर कुंडल
armature conductor, आर्मेचर वाही
armature core, आर्मेचर क्रोड
armature core disc, आर्मेचर क्रोड चकती
armature core field, आर्मेचर क्रोड क्षेत्र
armature core flux, आर्मेचर क्रोड अभिवाह
armature core plate, आर्मेचर क्रोड पत्री

armature ducts, आर्मेचर वाहिन्या (स्त्री.अ.व.)
armature end connections, आर्मेचर अग्र बंध (पु.अ.व.)
armature end-plate, आर्मेचर अंत्य-पत्री
armature field, आर्मेचर क्षेत्र
armature leakage impedance, आर्मेचर गलन संरोध
armature leakage reactance, आर्मेचर गलन प्रतिरोध
armature reactance, आर्मेचर प्रतिरोध
armature reaction, आर्मेचर प्रतिक्रिया
armature reaction factor, आर्मेचर प्रतिक्रिया अंक
armature reaction field, आर्मेचर प्रतिक्रिया क्षेत्र
armature shaft, आर्मेचर दंड
armature sleeve, आर्मेचर बाही
armature slot, आर्मेचर खाच
armature spider, आर्मेचर क्रोडधारी
armature spindle, आर्मेचर चाती
armature stamping, आर्मेचर ठसापत्री
armature winding, १ आर्मेचर कुंडलन २ आर्मेचर कुंडल
armature yoke, आर्मेचर जू
armour, *n.* कवच (न.)
armour-clad switch gear, कवचित स्विच गिअर
armour clamp, कवच पकड
armoured cable, कवचित केबल
Aron meter, अरॉन मीटर
arrangement, *n.* विन्यास (पु.), रचना (स्त्री.), मांडणी (स्त्री.)
array, *n.* विन्यास (पु.)
arrester, *n.* (*also* arrestor) प्रग्राही (पु.)
arrester strip, प्रग्राही पट्टी
articulated train, संधिबद्ध गाडी
articulation, *n.* १ उच्चारण (न.) २ संधिबंधन (न.)
artificial, *adj.* कृत्रिम
artificial antenna, (*also* dummy antenna) कृत्रिम आकाशग, निष्कर्म आकाशग
artificial cooling, कृत्रिम शीतन
artificial daylight, कृत्रिम दिनप्रकाश
artificial horizon, कृत्रिम क्षितिज
artificial transmission lines, कृत्रिम पारेषण तारमार्ग (पु.अ.व.)
aspect ratio, दर्शनी गुणोत्तर, दर्शनी अनुपात
assay, *v.t.* परीक्षण करणे
assaying, *n.* परीक्षण (न.)
assemble, *v.t.* जुळवणी करणे
assembled, *adj.* जुळवलेला
assembler, *n.* जुळवणारा (पु.)
assembly, *n.* १ जुळवणी (स्त्री.) २ समुच्चय (पु.)
association, *n.* १ सहचरण (न.) २ संयुति (स्त्री.)
astable multivibrator, अस्थायी बहुकंपित्र
astatic, *adj.* अस्थितिक
astatic galvanometer, अस्थितिक गॅल्व्हानोमापी, अस्थितिक गॅल्व्हानोमीटर
astatic system, अस्थितिक पद्धति
astronomy, *n.* खगोलशास्त्र (न.)
asylum switch = locking switch
asymmetrical, *adj.* असममित
asymmetrical light distribution, असममित प्रकाश वितरण
asymmetrical sideband system, असममित पार्श्वपट्ट पद्धति
asymmetrical voltage, असममित व्होल्टता
asymmetric reflection, असममित परावर्तन
asymmetric reflector, असममित परावर्ती
asymmetric refraction, असममित अपवर्तन
asymmetric refractor, असममित अपवर्ती
asymmetric sideband, असममित पार्श्वपट्ट
asymmetric sideband transmission, असममित पार्श्वपट्ट पारेषण
asymmetry, *n.* असममिति (स्त्री.)

asynchronous, *adj.* असंकालिक
asynchronous crawling, असंकालिक मंदचाल
asynchronous generator, असंकालिक जनित्र
asynchronous machine, असंकालिक यंत्र
asynchronous motor, असंकालिक चलित्र
a.t. (*also* A.T.) (*abbr.* for ampere-turn) अॅ. वे. (अॅम्पिअर वेढा)
atmosphere, *n.* वातावरण (न.)
*cf.* climate, हवामान
weather, हवामान, वायुमान
atmospheric disturbances, वातावरणीय विक्षोभ (पु.अ.व.)
atmospheric noise, (*also* atmospherics) वातावरणीय कुरव
atmospheric noise recorder, वातावरणीय कुरव अभिलेखी
atmospheric refraction, वातावरणीय अपवर्तन
atmospherics = atmospheric noise
atom, *n.* अणु (पु.)
atomic, *adj.* आण्विक, अणु–
atomic energy, अणु ऊर्जा
atomic hydrogen arc welding, अणु हायड्रोजन प्रज्योत सांधण
atomic hydrogen welding, अणु हायड्रोजन सांधण
atomic nucleus, अणु गर्भ
atomic pile, अणु चिति
atomic reactor, अणु भट्टी
atomic structure, अणु संरचना
atomiser, *n.* कणित्र (न.)
atom smasher, अणुभंजी (पु.)
attenuation, *n.* १ क्षीणन (न.) २ क्षीणता (स्त्री.)
attenuation band, क्षीणन पट्ट
attenuation coefficient, क्षीणन गुणांक
attenuation constant, क्षीणन स्थिरांक
attenuation correction, क्षीणन सुधार
attenuation current, क्षीणन धारा
attenuation distortion, क्षीणन विकृति
attenuation equaliser, क्षीणन समकारी
attenuation equalising network, क्षीणन समकारी जालव्यूह
attenuation factor, क्षीणनांक (पु.)
attenuation ratio, क्षीणन अनुपात, क्षीणन गुणोत्तर
attenuator, *n.* क्षीणनकारी (पु.)
attenuator pad, क्षीणनकारी पॅड
attracted-disc electrometer, आकर्षित-चकती विद्युतमापी
attributes of colour sensation, वर्णसंवेदन गुणविशेष (पु.अ.व.)
audibility, *n.* श्राव्यता (स्त्री.)
audio frequency, (A.F.) श्रुति वारंवारता
audio-frequency amplifier, श्रुति-वारंवारता प्रवर्धी
audio-frequency choke, श्रुति-वारंवारता चोक
audio-frequency transformer, श्रुति–वारंवारता परिवर्तित्र
audio howler, श्रुति कोलाहलित्र
audio howling, श्रुति कोलाहलन
audiotype output meter, श्रुतिप्रकार प्रदान मापी
audio volume control, १ श्रुति ध्वनिमान नियंत्रण २ श्रुति ध्वनिमान नियंत्री
autoalarm, *n.* स्वयंचलित भयसूचक (पु.)
auto-converter, *n.* स्वयंरूपांतरित्र (न.)
auto-correlation detector, स्वसहसंबंध शोधी
autodyne principles, स्वबल तत्त्वे (न.अ.व.)
auto-gain control, (*also* automatic gain control) स्वयंलब्धि नियंत्रण
autograph, *n.* स्वलेख (पु.)
automatic, *adj.* स्वयंचलित
automatic arc welding, स्वयंचलित प्रज्योत सांधण

**automatic circuit-breaker,** स्वयंचलित परिपथवियोजी
**automatic contact-making device,** स्वयंचलित संपर्कन साधन
**automatic direction-finder,** स्वयंचलित दिशाशोधी, स्वयंचलित दिशान्वेषी
**automatic disconnection,** स्वयंचलित विसंधान
**automatic frequency control, (A.F.C.)** १ स्वयंचलित वारंवारता नियंत्रण २ स्वयंचलित वारंवारता नियंत्री
**automatic gain control = auto-gain control**
**automatic grid bias,** स्वयंचलित ग्रिड अभिनति
**automatic power plant,** स्वयंचलित शक्ति संयंत्र
**automatic regulation,** स्वयंचलित नियमन
**automatic restarting,** स्वयंचलित पुनःप्रवर्तन
**automatic signalling,** स्वयंचलित संकेतन
**automatic starter,** स्वयंचलित आरंभी
**automatic substation,** स्वयंचलित उपकेंद्र
**automatic synchroniser,** स्वयंचलित संकालक
**automatic tap-changing equipment,** स्वयंचलित शाखन-बदल सामग्री
**automatic tone compensation,** स्वयंचलित स्वर प्रतिपूरण
**automatic traffic light,** स्वयंचलित वाहतूक दिवा
**automatic train stop,** स्वयंचलित गाडी रोख
**automatic trolley reverser,** स्वयंचलित चाकाळी व्युत्क्रमी
**automatic tuning,** स्वयंचलित मेलन
**automatic voltage,** स्वयंचलित व्होल्टता
**automatic voltage regulator,** स्वयंचलित व्होल्टता नियामी
**automatic volume control,** १ स्वयंचलित ध्वनिमान नियंत्रण २ स्वयंचलित ध्वनिमान नियंत्री
**automobile,** *n.* स्वयंचलित्र (न.)
**automobile antenna,** स्वयंचलित्र आकाशग
**automobile headlights,** स्वयंचलित्र पुरोदीप (पु.अ.व.)
**autopilot,** *n.* स्वयंअभिदर्शी (पु.)
**auto-reclose circuit-breaker,** स्वयंपुनर्योजी परिपथवियोजी
**autoset level,** स्वयंस्थापी समतलमापी
**Autosyn = synchro**
**auto-synchronising,** *n.* स्वयंसंकालन (न.)
**auto-synchronous motor,** स्वयंसंकालिक चलित्र
**auto-transformer,** *n.* स्वयंपरिवर्तित्र (न.)
**auto-transformer starter,** स्वयंपरिवर्तित्र आरंभी
**autovalve,** *n.* स्वयंझडप (स्त्री.)
**autovalve arrester,** स्वयंझडप प्रग्राही
**auto-voltage regulator,** स्वयंव्होल्टता नियामी
**auxiliary arc,** साह्यकारी प्रज्योत
**auxiliary contact,** साह्यकारी संपर्क
**auxiliary electrode,** साह्यकारी इलेक्ट्रोड
**auxiliary gap,** साह्यकारी अंतर
**auxiliary lift-motor,** साह्यकारी उद्वाहीचलित्र
**auxiliary plant,** साह्यकारी संयंत्र
**auxiliary pole,** साह्यकारी ध्रुव
**auxiliary spark gap,** साह्यकारी स्फुल्लिंग अंतर
**auxiliary switch,** साह्यकारी स्विच
**auxiliary winding,** साह्यकारी कुंडलन
**available noise-power,** उपलब्ध कुरवशक्ति
**average,** *n.* सरासरी (स्त्री.)
**average current,** सरासरी धारा
**average current density,** सरासरी धारा घनता
**average illumination,** सरासरी दीपन
**average noise factor = average noise figure,** सरासरी कुरव अंक

**average noon sunlight,** सरासरी मध्यान्ह सूर्यप्रकाश
**A-voltage,** *n.* A-व्होल्टता (स्त्री.)
**axial,** *adj.* अक्षीय
**axial alignment,** अक्षीय संरेखन
**axial duct,** अक्षीय वाहिनी
**axis,** *n.* अक्ष (पु.), आस (पु.)
**axis of commutation,** संपरिवर्तन अक्ष
**axle-mounted motor,** आस-अधिरोहित चलित्र
**Ayrton-Mather galvanometer,** आयर्टन-मेथर गॅल्व्हानोमापी
**Ayrton shunt,** आयर्टन पार्श्वपथ

# B

**Babbitt's metal,** बॅबिट धातु
**back ampere-turns,** पश्च ॲम्पिअर वेढे (पु.अ.व.)
**back-coupling,** *n.* पश्च-युग्मन (न.)
**back current,** पश्च धारा
**back-electromotive force,** (*abbr.* **back-e.m.f.**) (*also* **counter-electromotive force**) प्रति-विद्युतगामी बल
**back-electromotive force (back-e.m.f.) cells,** (*also* **counter-electromotive force cells**) प्रतिविद्युतगामी बल घट (पु.अ.व.)
**back-emission,** पश्च उत्सर्जन
**back-end of armature,** आर्मेचरचे मागील टोक
**back-fire,** *n.* पश्च-प्रज्वलन (न.)
**back-firing,** *n.* पश्च-प्रज्वलन (न.)
**background count,** पृष्ठभूमि गणनांक
**background noise,** पृष्ठभूमि कुरव
**background projection,** पृष्ठभूमि प्रक्षेपण
**backheating,** *n.* प्रतिऊष्मन (न.)
**back-kick,** *n.* प्रत्याघात (पु.)
**backlash,** *n.* विगति (स्त्री.)
**back lighting,** पश्च दीपन
**back lobe,** पश्च पालि
**back of machine,** यंत्राची मागील बाजू
**back oscillation,** पश्च दोलन
**back pitch** = **backward pitch**
**backplate,** *n.* पश्च-पत्री (स्त्री.)
**back porch,** पश्च अलिंद
**back-porch effect,** पश्च-अलिंद प्रभाव
**back pressure,** प्रतिदाब (पु.)
**back-pressure valve,** प्रतिदाब झडप
**back projection,** १ पश्च प्रक्षेप २ पश्च प्रक्षेपण
**back radiation,** पश्च प्रारण
**back scattering,** पश्च विकिरण
**back scatter method of measurement,** पश्च विकिरण मापन पद्धति
**back stop of key,** कळीचा पश्च सीमक, कळ पश्च सीमक
**back-to-back connection,** विमुख जोडणी
**back-to-back test,** विमुख चाचणी
**backward lead,** (*also* **backward shift**) पश्च-सृति (स्त्री.)
**backward lead of brushes,** कुंचली पश्चता, कुंचली पश्चसृति
**backward pitch,** (*also* **back pitch**) पश्च अभ्यंतर
**backward rotating component,** पश्च घूर्णी घटक
**backward shift** = **backward lead**
**backward-travelling,** *adj.* पश्चगामी
**backward wave,** पश्च तरंग
**backward-wave oscillator,** पश्चतरंग दोली
**backward-wave tube,** पश्चतरंग नलिका
**bad earth,** कु-भूसंपर्कन (न.)
**bad thermal conductor,** औष्णिक दुर्वाही, तापीय दुर्वाही
**baffle,** *n.* बाधिका (स्त्री.)
**Bakelite,** *n.* बॅकेलाइट (न.)
**balance,** *n.* १ तुला (स्त्री.), तराजू (पु.) २ संतोल (पु.) ३ संतुलन (न.)
**balance beam meter,** संतुलन शलाकामापी

**balance coil**, संतुलन कुंडल
**balance control**, १ संतुलन नियंत्रण २ संतुलन नियंत्री
**balanced amplifier**, संतुलित प्रवर्धी
**balanced circuit**, संतुलित परिपथ
**balanced modulator**, संतुलित आपरिवर्ती
**balanced oscillator**, संतुलित दोली
**balanced polyphase load**, संतुलित बहु-प्रावस्था भार
**balanced polyphase system**, संतुलित बहु-प्रावस्था पद्धति
**balanced reaction coil**, संतुलित प्रतिक्रिया कुंडल
**balanced resistance**, संतुलित रोध
**balanced system**, संतुलित पद्धति
**balanced three-phase load**, संतुलित त्रि-प्रावस्था भार
**balanced three-wire system**, संतुलित त्रितार पद्धति
**balancer**, *n.* संतोली (पु.)
**balancing**, *n.* (*also* matching) १ संतुलन (न.) २ अनुरूपण (न.)
**balancing of telegraph-lines**, दूरलेखन तार-मार्ग संतुलन
**balancing speed**, (*also* free-running speed) १ मुक्तधाव चाल २ संतुलन चाल
**balancing thermopile**, संतुलन तापपुंज
**balancing transformer**, संतुलन परिवर्तित्र
**balata**, *n.* बलाटा (पु.)
**ball-and-socket joint**, उखळी सांधा
**ballast**, *n.* स्थैर्यभार (पु.)
**ballast coil**, स्थैर्यभार कुंडल
**ballast lamp**, स्थैर्यभार दीप.
**ballast resistance**, स्थैर्यभार रोध
**ballast resistor**, (*also* barretter) भाररोधी (पु.), स्थैर्यभाररोधी (पु.), बॅरेटर (पु.)
**ballast tube**, स्थैर्यभार नलिका
**ballistic galvanometer**, प्रक्षेप गॅल्व्हानोमापी
**ballistic measurement**, प्रक्षेप मापन
**ballistics**, *n.* प्राक्षेपिकी (स्त्री.)
**ball lightning**, तडितगोल (पु.), विजेचा लोळ
**balun**, *n.* संतुलनित्र (न.)
**band**, *n.* पट्ट (पु.)
**band elimination filter**, (*also* stop filter) पट्टवर्जी गाळणी
**banding**, *n.* पट्टन (न.)
**band-pass filter**, पट्ट-पार गाळणी
**band relay**, (*also* band repeater) पट्ट पुनरावर्ती
**bandspread in receiver**, ग्राहीतील पट्टप्रसरण
**bandspread receiver**, पट्टप्रसरण ग्राही
**bandwidth**, *n.* पट्टरुंदी (स्त्री.)
**bang-bang control**, बॅंग-बॅंग नियंत्रण
**bank cable**, कोष केबल
**banked battery**, कोषित बॅटरी
**banked winding**, कोषित कुंडलन
**bank of lamps**, दीपकोष (पु.)
**bank of lifts**, उद्वाही गट
**bank of transformers**, परिवर्तित्र कोष
**bar**, *n.* १ दंड (पु.) २ पट्टी (स्त्री.) ३ शलाका (स्त्री.) ४ गज (पु.)
**bare cable**, अनावृत केबल
**bare conductor**, अनावृत वाही
**bare electrodes**, अनावृत इलेक्ट्रोड (पु.अ.व.)
**Barff's process**, बार्फ प्रक्रिया
**Barkhausen-Kurz oscillator** = **Barkhausen oscillator**, बार्कहाऊझेन-कुर्त्स दोली, बार्कहाऊझेन दोली
**bar magnet**, दंड चुंबक
**barrel winding**, टीप कुंडलन
**barretter** = **ballast resistor**
**barrier**, *n.* बांध (पु.)
**barrier-grid storage**, बांध-जाळी संचय
**barrier layer**, बांध स्तर
**barrier-layer cell**, बांधस्तर घट
**barrier-layer photocell**, बांधस्तर प्रकाशघट

